गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजनेतर्गंत विविध जिल्ह्यात झालेल्या कामांना निधी वितरण करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- गामुध २०२४/प्र.क्र. ३३/जल-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ०६ मार्च,२०२४

**वाचा:-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल,२०२३.
२. शासन निर्णय,मृद व जलसंधारण विभाग क्र: जशिअ-२०२२/प्र.क्र ३०२/जल-७, दि. दि.३.१.२०२३
३. शासन निर्णय , मृद व जलसंधारण विभाग क्र: गामुध २०२२/प्र.क्र.२२/जल-१३, दि. २०.०४.२०२३
४. शासन पुरकपत्र क्र.गामुध-२०२२/प्र.क्र.२२/जल-१३ (जल-१),दि.०५.०२.२०२४
५. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०५.०२.२०२४

**प्रस्तावना:-**

गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार ही योजना राज्यात कायमस्वरुपी राबविण्याचा निर्णय शासन निर्णय दि. २०.०४.२०२३ नुसार घेण्यात आला आहे. त्यानुसार सदर योजनेंतर्गत विविध जिल्ह्यात गाळ काढण्याची कामे करण्यात आली आहेत. जलयुक्त शिवार २.० व गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजनेचा आढावा घेण्यासाठी मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि. २९.१२.२०२३ रोजी आयोजित बैठकीत झालेल्या निर्णयानुसार गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजनेची अंमलबजावणी करतांना कामामध्ये अनेक वेळा व अनेक ठिकाणी मशीन द्वारे गाळ काढणे करिता स्वयंसेवी संस्था उपलब्ध होत नाही व त्याअभावी कामे रखडतात, असे निदर्शनास आले आहे. त्यामुळे अशासकीय संस्था उपलब्ध नसल्यास अशा वेळी ग्रामपंचायत मार्फत कामे करण्याबाबत विभागामार्फत तपासणी करण्याचे तसेच देयके अदा करण्याच्या कार्यपध्दतीमध्ये सुलभता आणून जिल्हास्तरावर देयके अदा करण्याची कार्यपध्दती अवलंबविण्यात यावी, असे निर्देश सदर बैठकीत देण्यात आले आहे. त्यानुषंगाने राज्यात गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजना अधिक सुलभतेने व गतीने राबविण्यासाठी दि.२०.४.२०२३ च्या शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्यात आली असून त्यासंदर्भात शासन पुरकपत्र दि. ५.२.२०२४ निर्गमित करण्यात आले आहे.

शासन पुरकपत्र दि. ५.२.२०२४ नुसार कार्यकारी अभियंता, मृद व जलसंधारण विभाग यांनी संबंधित अशासकीय संस्था/ग्रामपंचायतीस देयके जिल्हास्तरावर अदा करावीत. त्यासाठी एकत्रित निधी मागणी जिल्हा जलसंधारण अधिकारी यांनी जिल्हाधिकारी यांच्या मार्फत शासनास करावी, अशी सुधारणा करण्यात आली आहे. गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजनेसंदर्भात झालेल्या कामाची देयके अदा करण्याची कार्यवाही जिल्हास्तरावर करण्यात येणार आहे व त्यासाठी आवश्यक निधी शासनाकडून उपलब्ध करून देण्यात येणार

आहे. त्यानुसार विविध कार्यकारी अभियंता, मृद व जलसंधारण विभाग यांचेकडून सदर योजनेंतर्गत झालेल्या कामाची देयके अदा करण्यासाठी निधी मागणी विवरणपत्रानुसार सादर केलेली आहे. सदर प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार निधी वितरीत करणे आवश्यक आहे. त्यानुसार सदर योजनेच्या झालेल्या कामासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजनेतंर्गत विविध जिल्ह्यात गाळ काढण्याची कामे अशासकीय संस्थेमार्फत करण्यात आलेली आहे. सदर कामांचे देयक अदा करण्यासाठी एकूण रुपये **१२,७०,८९,९०६/- (रुपये बारा कोटी सत्तर लक्ष एकोणनव्वद हजार नऊशे सहा फक्त)** इतका निधी **सोबतच्या विवरणपत्र "अ" नुसार** वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधी पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे:-

अ) या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र अ नुसार आयुक्त, जलसंधारण, औरंगाबाद यांनी संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांना तात्काळ वितरीत करावा.

ब) गाळ काढलेल्या कामाची व पंचनामा करुन गाळ नेणाऱ्या शेतकऱ्यांना अदा करावयाच्या अनुदानाची खातरजमा करुन, देयकाच्या आधारे निधीचे वितरण करण्यात यावे.

क) मंजूर (अदा करावयाच्या) निधीपेक्षा जास्तीची रक्कम अदा करण्यात येऊ नये.

ड) कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदरची रक्कम परस्पर अन्य कामासाठी वितरित न करता तातडीने शासनाकडे प्रत्यार्पित करावी.

इ) निधी वितरणासंबंधित गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजने संदर्भातील शासन निर्णयान्वये निर्धारित कार्यपध्दती व सूचनांचे/ तरतुदींचे अनुपालन करण्यात आले असल्याबाबतची खातरजमा करण्यात यावी.

ई) वितरीत करण्यात येत असलेला निधी गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार अंतर्गत झालेल्या कामासाठीच वितरीत करण्यात यावा.

ए) निधी वितरीत करताना संबंधित कामाबाबत तक्रार नसल्याची खातरजमा करावी.

ऐ) उपलब्ध करुन देण्यात येत असलेला निधी तात्काळ खर्च करण्याबाबतची कार्यवाही करावी.

अं) गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार योजनेतर्गत झालेल्या कामाच्या देयकांची छाननी व देयके तपासण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांची राहील.

आं) सदर निधी वितरण करताना काही अनियमितता झाल्यास त्यास संबंधित कार्यालय जबाबदार राहील,

३. याद्वारे अशासकीय संस्थांना जिल्हा जलसंधारण अधिकारी हे सदंर्भीय क्र. ४ येथील शासन निर्णयातील निधी वितरण तरतूदीनुसार वितरीत करतील.

४. यावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक - झेडएच-५**
**(०२) जलयुक्त शिवार**
**(०२)(०१) जलयुक्त शिवार अभियान (कार्यक्रम) (४४०२ २७८१)**
**५३, मोठी बांधकामे**

५. याद्वारे वितरीत निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकारी यांची राहील तसेच तालुका स्तरावर उपविभागीय जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग यांची राहील.

६. प्रस्तुत आदेश, वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०६१८०९३७१९२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SUNIL MAHADEV KALE

Digitally signed by SUNIL MAHADEV KALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=d5c8d23e6cc09fb2bb4aa1777dadbfbb405c54e877afe06798f54168b9f08b98, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=30B26A65349009C49CCA04C5AECBC47F35D7524B402BBD5D7FA6DDD215CFF18D, cn=SUNIL MAHADEV KALE
Date: 2024.03.06 18:19:13 +05'30'

**( सु. म. काळे )**
**मुख्य अभियंता तथा सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मंबई
२. मा. मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव.
३. मा.विरोधीपक्ष नेता, विधान परिषद/विधानसभा, विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
४. सर्व मा.संसद सदस्य, विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खासगी सचिव
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.

७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
८. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
९. मा. सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक.
१०.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -२, नागपूर.
११.आयुक्त मृद व जलसंधारण, जल आयुक्तालय, औरंगाबाद.
१२.सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय
१३.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१४.अपर आयुक्त जलसंधारण तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे
१५.सर्व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग
१६.सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग
१७.उपविभागीय जलसंधारण अधिकारी, सर्व मृद व जलसंधारण उपविभाग
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९.कक्ष अधिकारी, कार्यासन जल-११, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०.निवड नस्ती जल-१

## गाळमुक्त धरण व गाळयुक्त शिवार या योजनेतंर्गत झालेल्या कामाची देयके अदा करण्यासाठी शासनास प्राप्त निधी मागणीनुसार निधी वितरीत करण्यासाठी

## विवरणपत्र 'अ'

| अ.क्र. | जिल्हा | काम करणारी अशासकीय संस्था | एकूण कामे | देयकाच्या विवरणपत्रानुसार वितरीत करावयाचा निधी (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | **सांगली** | १.नवजीवन ग्रामविकास प्रतिष्ठान, सोलापूर<br>२.सोमलिंग ग्रामविकास मंडळ, गुंजेवाडी<br>३.ओम आदित्यनाथ सांप्रदाय मोहननाथ महाराज सेवाभावी विश्वस्त निधी मल्लेवाडी | ९ | **रु. ३२,२२,०००/-** |
| २ | **सोलापूर** | १.शरद फलोद्यान सहकारी संस्था मर्यादित, बार्शी जि. सोलापूर<br>२.शिवराज बहुउद्देशिय संस्था, मार्डी<br>३.अभिनव भारत समाजसेवा मंडळ, सालसे | १० | **रु.२,७९,४६,७२७/-** |
| ३ | **अकोला** | १ नेहरु युवा बहूउद्देशिय संस्था पांगरताटी<br>२.व-हाड विकास सेवा प्रतिष्ठान ता. जि. अकोला<br>३.सम्यक व्यायाम क्रिडा व बहूउद्देशिय संस्था गुडधी ता. जि. अकोला.<br>४.श्री दत्त ग्रामिण व शहरी विद्या प्रसारक मंडळ, अकोला. | १० | **रु. १,१५,०२,३९०/-** |
| ४. | **यवतमाळ** | १.ग्रांमीण व शहरी विकास बहूउद्देशीय शिक्षण संस्था, पुसद<br>२.विकासगंगा समाजसेवी संस्था जि. यवतमाळ<br>३.श्री सत्यसाई ग्रामीण विकास व शिक्षण प्रसारक मंडळ,यवतमाळ<br>४.श्री गुरूवर्या शिक्षण प्रसारक मंडळ,यवतमाळ<br>५.दत्त बहूउदेशिय संस्था ,यवतमाळ.<br>६.श्री स्वामी समर्थ बहुउददेशिय संस्था यवतमाळ<br>७.आदर्श बहूउददेशिय संस्था,यवतमाळ<br>८. राहुल इंस्टीटयुड न्याशनल अग्रोशिप वेलफेअर याग्रीएड एज्युकेशनल रूई वाई<br>९. काबील फाउंडेशन यवतमाळ | १४ | **रु. १,५०,४९,६००/-** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | १०. नवविदया बहुउददेशिय संस्था यवतमाळ<br>११. परिवर्तन बहुउददेशिय संस्था आर्णि<br>१२.स्व.सौ.शांताबा ई भोयर ग्रा.वि. बहुउददेश्यि संस्थाता.केळापुर<br>१३. त्रिनेत्र पदुम कृषी व ग्रामीण बहुददेशिय शिक्षण संस्था, चानी | | |
| ५ | **जळगाव** | १. निसर्ग बहूउद्देशिय संस्था, जि. जळगाव | ५ | **रु. २४,२१,३८२/-** |
| ६ | **औरंगाबाद** | मराठवाडा ग्रामिण विकास संस्था, | २ | **रु. २८,७८,५२१/-** |
| ८ | **ठाणे** | १.भारतीय जैन संघटना व वसुंधरा संजीवनी मंडळ | १६ | **रु. १४,०५,९८८/-** |
| ९ | **जालना** | १.समस्त महाजन ट्रस्ट, जालना (५ कामे)<br>२.श्री. संत मोतीराम महाराज बहूउद्देशिय सेवाभावी संस्था, जालना (३ कामे) | ८ | **रु. ७६,५७,८३७/-** |
| १० | **भंडारा** | १.प्रज्ञा शील करूणा बहूउद्देशिय संस्था, सामेवाडा<br>२.त्रिनेत्र पदुम व ग्रामिण बहूउद्देशिय शिक्षण संस्था, बेला | ३ | **रु. ५,१८,९८६/-** |
| ११ | **परभणी** | १. ग्रामीण विकास सेवा संस्था, औरंगाबाद<br>२. प्रथम जनकल्याण सेवाभावी संस्था,सेलु<br>३.स्नेहवर्धिनी ता.मजूर सहकारी संस्था, परभणी<br>४.सावंगी (खु) मजूर सहकारी संस्था (म.) सावंगी (खु), ता.जि.परभणी<br>५.गायत्री जनकल्याण सेवाभावी संस्था सेनगाव हिंगोली<br>६.प.पु.डॉ.बाबासाहेब आंबेडकर शिक्षक प्रसारक मंडळ पालम<br>७. सरस्वती बहुउद्देशिय सेवाभावी संस्था<br>८. निलकंठेश्वर बहुउद्देशिय सेवाभावी संस्था<br>९. आदित्य नागराज च्यारीटेबल ट्रस्ट<br>१०. हिंद मजूर सहकारी संस्था<br>११. टेक्नो स्पार्ट ग्राम विकास<br>१२. धर्मा नाईक ग्रामीण विकास<br>१३. महात्मा ज्योतीबा फुले<br>१४. सेवादास ग्रामविकास मंडळ<br>१५. भावना बहुउद्देशिय महिला मंडळ | २९ | **रु. २,६९,६७,१५४/-** |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **१२** | **वाशिम** | कान्होबा बहूद्देशिय संस्था मंगरुहनाथ, जि. वाशिम | २ | **रु. ४३,७६,६८०/-** |
| **१३** | **बीड** | १.यश बहूउद्देशिय सेवाभावी संस्था फुलेपिंपळगाव. ता. माजलगाव<br>२.छत्रपती शाहु महाराज संस्था, | ५ | **रु. ५३,८९,६४४/-** |
| **१५** | **नंदुरबार** | नवनिर्माण शैक्षणिक व ग्रामीण विकास संस्था, ता.कडेगाव, जि.अहमदनगर | १ | **रु. ३८,३३,६२२/-** |
| **१६** | **अमरावती** | १.कृषी पदवीधर कृषी बहूउद्देशिक सेवा सहकारी संस्था मर्या. जि. अमरावती.<br>२. महाराष्ट्र ग्राम दर्पण, अमरावती | २ | **रु. १३,१७,०००/-** |
| **१७** | **पूणे** | नाम फाऊंडेशन | १५ | **रु. १,२६,०२,३७५/-** |
| | | **एकुण निधी** | | **रु.१२,७०,८९,९०६** |

********